अधीक्षक अभियंता (स्थापत्य) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्या / पदस्थापना.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः बदली-१२२४/प्र.क्र.६० (१)/सेवा-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- १६ मार्च, २०२४.

**शासन आदेश :-**

श्री. प्रशांत नामदेवराव पागृत, कार्यकारी अभियंता हे भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, नवी दिल्ली यांच्या नागपूर येथील विभागीय कार्यालयातील महाव्यवस्थापक (तांत्रिक) या पदावर कार्यरत असतांना, त्यांना सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन आदेश, दि.२०.०२.२०२३ अन्वये, अधीक्षक अभियंता (स्था.) या संवर्गात प्रपत्र बढती देण्यात येऊन, त्यांची पदस्थापना महाव्यवस्थापक (तांत्रिक), भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, नवी दिल्ली (विभागीय कार्यालय, नागपूर) या पदावरच करण्यात आली होती.

२. भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, नवी दिल्ली यांनी त्यांच्या दि.२९.१२.२०२३ रोजीच्या कार्यालयीन आदेशान्वये, श्री. पागृत यांच्या सेवा विभागाकडे प्रत्यावर्तीत केल्या आहेत. त्यानुसार, श्री. पागृत हे पदस्थापनेकरिता प्रतिक्षेत होते. त्यांनी दि.१७.०१.२०२४ रोजीच्या विनंती अर्जान्वये विभागात पदस्थापना देण्याबाबत विनंती केली आहे.

३. श्री. पागृत यांना खालील विवरणपत्रात त्यांच्या नांवासमोर स्तंभ-४ मध्ये दर्शविलेल्या पदावर पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याची पदस्थापना | बदली नंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री. प्रशांत नामदेवराव पागृत | पदस्थापनेकरिता प्रतिक्षेत. | अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळ मर्यादित, मुंबई. **(रिक्त पदी)** |

२. श्री. पागृत यांनी नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. संबंधित अधिकाऱ्यांनी म. ना. से. (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमानुसार दिलेल्या पदग्रहण अवधीतच, पदस्थापनेच्या पदावर रुजू होणे आवश्यक राहिल. अन्यथा त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. तसेच, त्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९, मधील नियम २३ कडे वेधण्यात येत आहे.

सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

३. श्री. पागृत यांनी नवीन पदाचा कार्यभार स्वीकारल्याचा दिनांक त्वरित शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल पत्त्यावर कळवावा.

४. श्री. पागृत यांची पदस्थापना त्यांच्या विनंतीनुसार करण्यात येत असल्याने, त्यांना पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता देय राहणार नाही.

५. श्री. पागृत यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर पदस्थापना देण्यात आली असून, सदर पदस्थापना ही महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या परिशिष्ट दोन मध्ये विहित केलेल्या प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्तींच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

६. श्री. पागृत यांनी नवीन पदस्थापनेच्या पदाचा कार्यभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप, पुणे यांना कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१६१३५६२६४४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DATTATRAY VASANTRAO KHARKE

Digitally signed by DATTATRAY VASANTRAO KHARKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=d598800beb5ed37ae09d78fff05921827123426ec3977a7476478ce183be979d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6BAEF55AD6F77A3A40CCCC3E9DD0F50E344AB83A754542299875CF07868ED88B, cn=DATTATRAY VASANTRAO KHARKE
Date: 2024.03.16 14:05:31 +05'30'

( द. व. खारके )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन), मंत्रालय, मुंबई.
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळ मर्यादित, मुंबई.
५. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई /कोकण/ पुणे / नाशिक / छत्रपती संभाजीनगर / नांदेड / अमरावती / नागपूर/ राष्ट्रीय महामार्ग विभाग, नवी मुंबई.
७. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे.
८. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम **मंडळे.**
९. श्री. प्रशांत नामदेवराव पागृत, अधीक्षक अभियंता (पदस्थापनेकरिता प्रतिक्षेत).
१०. संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. महालेखापाल -१/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१२. अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई.
१३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

१५. सामान्य प्रशासन विभाग, का.-१३/१२, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
१७. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
१८. सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. कार्यासन आस्था-१, आस्था- ३, सेवा-६, संगणक कक्ष, रोख शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. निवडनस्ती.